**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, रांगी, ता.धानोरा, जि.गडचिरोली येथील संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.१३९/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ एप्रिल, २०१०.

**शासन निर्णय** : प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, रांगी, ता.धानोरा, जि.गडचिरोली येथील संरक्षक भिंतीच्या बांधकामाचे रु.१२,४५,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रक संबंधित कनिष्ठ अभियंता यांनी तयार केले असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली, उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२, गडचिरोली, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, गडचिरोली यांनी साक्षांकित केले आहे.

३. सदर अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. सदर काम बांधकामाचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली यांचे कार्यक्षेत्रातील संरक्षक भिंत बांधकामाच्या अंदाजपत्रकातून ४% कॉन्टीजन्सी चार्जेस व ५% सेंटेज चार्जेस व २०% वाढीव रक्कम वगळून रु.९,४८,०७३/- (रुपये नऊ लाख अठ्ठेचाळीस हजार त्र्याहत्तर फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओग्राफी करुन त्याची सी.डी. शासनास सादर करावी.

५. सदर बांधकामचा खर्च सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला,

उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००४२११३१६४२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**

महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली.
जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, गडचिरोली.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, गडचिरोली.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.